

# ओथंब २

मंजिरी सदाशिव सुशिला दाभोळकर

साहित्य प्रतिष्ठान

पुस्तकाचे नाव : ओथंब$^2$

कविता, मांडणी, सजावट : मंजिरी सदाशिव सुशिला दाभोळकर



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

**esahity@gmail.com**

इतर पुस्तकांसाठी व मासिकांसाठी **www.esahity.com** येथे भेट दयावी.

# प्रस्तावना

पावसावर कविता करणारे खुप कवी असतात, असं म्हणू की प्रत्येक कवी पावसावर निदान एक तरी कविता लिहीतोच लिहीतो, पण मंजिरी ती जणू काही फक्त पावसामुळे, पावसासाठी आणि पावसावरच कविता करते तिच्या कवितेत पाऊस नसतो तर तिची कविता पावसाने ओथंबलेली असते.

मंजिरीच्या कवितेत पावसाच्या थेंबांची शाळा भरते. तिचा पाऊस कधी वेदनांनी भरलेला तर कधी स्वप्नांनी भारलेला असतो. कोकणातल्या गरीब घरातला, चाळीतला पाऊस तिच्या कवितेत वेदनांचा वाटा घेऊन येतो, पण त्यातलं देवबाप्पाचं आंदणही तितकंच मोहमय असतं. कधी एखादी रोमँटिक सर असते तर कधी बाबांची आठवण आणणारं वादळ असतं. पावसाच्या अश्या अनेक छटा तिचा आधीचा कवितासंग्रह ‘ओथंब’ प्रमाणेच या ओथंब२ मध्ये पाहायला मिळतील.

मंजिरीच्या पाऊस कवितांमध्ये तुम्हीही चिंब व्हा अन् कविता कशा वाटल्या हे नक्की कळवा.

सुनिल सामंत – नामकाका

# मनोगत

रसिकहो,

सप्रेम नमस्कार विनंती विशेष,

मी, मंजिरी सदाशिव सुशिला दाभोळकर, मी पुन्हा आलेय ‘ओथंब - भाग २’ च्या निमित्ताने, तुमच्यासोबत माझा पाऊस शेअर करायला. सुरवातीच्या पावसात भिजुन झालेय थोडसं पण अंजुनही तो जाईपर्यंत त्याच्या सोबत भिजायचं आहे अगदी मन ओथंबुन जाईपर्यंत.

गेल्यावर्षी पाऊस उशिराच परत निघाला, अगदी जा-जा म्हंटलं तरी जाईनाच, उलट माझ्या पावसात भिजण्यावरुन एखाद्या मित्रासारखा छान गप्पाच्या मुडमधे मला मुद्दाम चिडवत, बोलत राहिला माझ्याशी चक्क माझ्या मालवणी भाषेत! ...

‘काय गो काय बघतसं माझ्याकडे भिजल्या डोळयांनी?
भिजुचा असा माझ्या वांगडा तर भिजुक ये जरासा ...’

सर्व कविता काल्पनिक असल्यातरी, काही कविता थोड्याश्याSSS अनुभवातल्या. ‘बाबा .... तु गेलास तेव्हा ...’ ही कविता मात्र माझ्या पप्पांच्या आठवणीत सहज सुचुन गेली. नेहमीच माझ्या पप्पांना आदरार्थी संबोधणारी मी या कवितेत आजच्या छोट्या पिढीप्रमाणे ‘ऐ बाबा’ असं म्हणतेय. खटकलंय मनात हे, अहो पप्पा वरुन ऐ बाबा म्हणताना, म्हणुन ही प्रांजळ कबुली.

झोपडीतला पाऊस ट्रेकिंगला गेल्यावर एखाद्या झोपडीत अनुभवलेला. भिजुन, गारठुन गेल्यावर अनोळख्या झोपडीतील स्वयंपाकघरातली चुल ओळखीची शेकोटीची उब देऊन गेली. चुलीजवळ शेकोटीला बसल्यावर घरमालकीणीबरोबर ओल्या लाकडाच्या धुरांमधे सुख-दुःखाच्या गोष्टी झाल्या. त्याबरोबरच इमारतीच्या पाचव्या मजल्यावरुन खाली दिसत असलेल्या बैठ्या चाळींवर बरसणारा पाऊस पाहून आपण सुरक्षित आहोत असं वाटतं.

काही कवितांमधे सर्वांच्याच बालपणीचा पावसातील हुंदडगा आहे, आईचं पावसात जाऊ नको असं ओरडणं आहे, कॉमन आहे ते अन् पावसात प्रकर्षाने जाणवणारा विरह, ओढ, प्रेम हे ही सर्वांचंच कॉमन आहे.

पाऊस म्हणजे... या कवितेत पावसाची लोभावणारी रुपं मी पाहीली, पावसामूळे पुर, रोगराई, घाण-कचरा, होणारे काही अपघात, ट्रॅफिकचा चक्का जाम, ट्रेन्सचा खोळंबा, तुंबलेलं पाणी, इत्यादी पावसामुळे जन्मलेली रुप आपण पाहत असतोच, त्यामुळे जाणाऱ्या मुडपेक्षा पावसाची ही हिरवी रुपं आठवलेली काय वाईट?

रसिकहो, मनपुर्वक धन्यवाद यासाठी की माझ्या कविता तुम्ही सहन केल्यात, तुमचे अभिप्राय मिळाले, त्यामुळेच ओथंब चा भाग २ लिहिण्यास मला हुरुप आला अन् पुन्हा मी लिहिती झाले. ई-साहित्य प्रतिष्ठान, नामकाका, भारती सरमळकर यांचे आभार. नामकाकांनी हे ईबुक मलाच करायला सांगुन, केलेल्या ईबुकच्या मडक्याला छानसा सजावटीचा आकार देताना भारती आणि नामकाकांनी मार्गदर्शन केलें. तसेच काही अनोळखी मित्र-मैत्रिणींचे आभार ज्यांनी नेटवर अपलोड केलेले फोटो मी माझ्या ईबुकसाठी वापरले.

तर रसिकहो, थांबते मी आता. हाका ऐकु येतायत पावसाच्या, भिजायला ये असं सांगतोय पाऊस. तुम्हीही चला माझ्याबरोबर पावसासोबत  भिजायला.

कळावे, लोभ असावा हि विनंती.

मंजिरी सदाशिव सुशिला दाभोळकर
मुंबई, महाराष्ट्र, भारत
manjee15@yahoo.com



आले जलद भरुनी
धारा येतील अंगणी
वाट पाहते मी त्याची
आला आला तो बरसुनी ।

आला वादळी पाऊस
फिरे वावटळी वारा
गेल्या भिजवूनी मला
या बरसत्या धारा ।

येतो मातीचा सुवास
मन झालं धुंद-धुंद
थेंब थेंब ओथंबूनी
तन झालं चिंब-चिंब ।

घेते झेलून पाऊस
दोन हाताच्या जोडीने
परि मावेना करात
जातो वाहून ओंजळीने ।

मन झालं ओलं ओलं
आता होईल रुजवात
मन उधानलं आता
पाऊस दाटला उरात ।



बरसला रानी-वनी घेऊन धुक्याची दुलई
दिसेना काही-बाही, आले दिस पावसाचे ओले

बरसला दरी-खोरी, घेऊन पाण्याची निळाई
धुराची ती रेघ उभी, आले दिस पावसाचे ओले

बरसला शिवारात, घेऊन बीजांची पेराई
धान रुजेल, वाढेल, आले दिस पावसाचे ओले

बरसला पानो-पानी, घेऊन रंगांची हिरवाई
फुलांची ही रंगपंचमी, आले दिस पावसाचे ओले

बरसला घरी-दारी, घेऊन थंडीची झिलई
उबाऱ्याच्या तऱ्हा किती, आले दिस पावसाचे ओले

बरसला मनो-मनी, घेऊन नव्याची नवलाई
मन उधान-उधान, आले दिस पावसाचे ओले



नको पागोळ्या धरु, नको खेळू पावसात
जातील घामोळे, पण ताप भिनेल अंगात ।

या पावसात नको जाऊ भिजायला
होईल सर्दीपडसं अन् जोडीला खोकला ।

चल चल घरामधे, येईल वीजबाई
कडाडली ती मग, जीव होई भागुबाई ।

शाळेला येताजाता नको डबक्यात उड्या मारु
होतील बोटांना चिखल्या अन् पायाला नारु ।

नको करु उगा दंगा पावसात भारी
सोडायला होड्या, नको फाडू वही कोरी ।

पावसात सारे तुझे मैदानी खेळ बंद
खेळ घरातच आता, लाव वाचनाचा छंद ।

ओल्या ओल्या पावसात मस्त चहा अन् भजी
छान छान गोष्टी तुला सांगेल तुझी आजी ।



पावसाच्या थेंबांची सुटेल आता शाळा
काळे ढग दाटले आता पाऊस आला पळा ।

नाही आणले छत्री-रेनकोट, पटापट चाला
दफ्तर घ्या डोक्यावरती, पाऊस आला पळा ।

रस्त्यामधे थांबू नका, डबक्यामधे खेळू नका
चिखल उडेल अंगावरती, पाऊस आला पळा ।

मुसळधार पावसात सारे होते चिडीचुप्प
विजा या कडाडती, पाऊस आला पळा ।

मोठ्या मोठ्या पावसाच्या मोठ्या मोठ्या गारा
नजर चुकवुन वेचुया का? पाऊस आला पळा ।

भिजायची ही मजा आगळी, आवडते मज भारी
सर्दीसोबत तापही येईल, पाऊस आला पळा ।



तापलेली जमीन, पावसासाठी आसुसली
मातीच्या कण-कणाने, तहानेने व्याकूळली ।

उन्हात होरपळून, कुठेकुठे भेगाळली
ओलावा नाही म्हणुन ढेकळाची बनली ।

पाऊस आल्यावर, चराचरातुन आनंदली
थेंब थेंब पिऊन मृद्गंधाने सुगंधली ।

पावसाच्या सोबतीने हिरवाई नेसली
हिरवळीची नक्षी ती रंग-फुलांनी भरली ।

चिंब-चिंब भिजून, ओलेती राहीली
पावसाचं देणं घेऊन नवं बीज अंकुरली ।

पावसाने न्हाली, धरणी झाली लेकूरवाळी
अंगाखांद्यावर तिच्या अल्पजीवी किड्या अळी ।

असा येतो कोसळतो, जातो कुस उजवून
अवघ्या कणा-कणाला देतो जीवन-जीवन ।

पाऊस असाच, चार महिन्याचा सखा
पुढे मग त्याच्याविना आठ महिने सुखा ।



हवेची झुळूक
वाऱ्याची शीळ
झाडांची पाने
गातात गाणे ।

पावसाची रिपरिप
थेंबांची टिपटिप
सर्द ओली हवा
गरमागरम चहा ।

पाण्यातल्या होड्या
मुलांच्या खोड्या
पाण्यातील मजा
सर्दीची सजा ।



पाऊस झोपडीतला
मातीतुन झिरपतो सारवलेल्या जमिनीतुन
चंद्रमौळी झोपडीमधे सांडतो थेंबातुन ।

झावळ्याच्या भिंती तिच्या शिंपण करतात
वाऱ्यासोबत पावसालाही घरामधे आणतात ।

थेंबेथेंबे तळे साचे, भांड्यामधे थेंब नाचे
थेंबाच्या या नाचातुन, टप-टप हा नाद वाजे ।

ओल्या चुलीला, ओलं सरपण, धुरामधे जीव कासावीस
वैलावर कढतं पेजेचं कढणं, पेज पिऊन काढायचा दिस ।

कोंढाळ साऱ्यांच, होते शेकोटी चुलीची
कोंदटलेल्या धुरात साथ सुख-दुःखाच्या गप्पांची ।



## पाऊस चाळीतला

छपरावरती पावसाचा ताशा वाजतोय
दारे-खिडाक्या बंद बाहेर पाऊस पडतोय

कौलांच्या भेंगातुन पावसाची झड येतेय
चाळीतली रुम तेव्हा ओली-दमट होतेय

पागोळ्यांच्या नळाखाली बादली भरतेय
नळाला आता पाणी नसलं तरी चालतेय

पाऊस ओसरला की पाणी ओसरतेय
पाऊस वाढला की पाणी तुंबतेय

वाट फुटल्यागत घरा-घरात शिरतेय
कधी कधी फरशीतुन झऱ्याने झिरपतेय

दिवे जातात मधेच कधी होतो अंधार
तेव्हा असतो जेवणाला कॅंडेल लाईटचा आधार

कोसळणाऱ्या पावसाची भीती असते मनात
रात्रीही झोप नसते, पाणी आले तर घरात

दरड कधी कोसळते, जीव हकनाक जातात
मदतीचे हात आधाराला भर पावसातही येतात

चाळीमधे राहताना पाऊस नको नको वाटतो
फ्लॅटमधे राहताना पाऊस हवाहवासा वाटतो



पाऊस म्हणजे गच्च भरुन आलेलं आभाळ, भिजलेली ओली सकाळ

पाऊस म्हणजे दाटलेलं पिसांसारखं धुकं, पळणाऱ्या ढगांचे पुंजके

पाऊस म्हणजे ट्रेकींग, जंगल भटकणं, रानवाटा तुडवणं

पाऊस म्हणजे शिरशिरणारा गारवा, चिंब भिजणारा मन-पारवा

पाऊस म्हणजे पानांच्या टोकावर थबकलेल्या थेंबांचा झोका,

पाऊस म्हणजे हिरवे-हिरवे गार गालिचे, हरीत तृणांच्या मखमालीचे

पाऊस म्हणजे कधीतरी भेटणाऱ्या मित्र-मैत्रिणींच्या पाऊस-भेटीचे

पाऊस म्हणजे हूरहूर, ओढ, दोन मनांचं मिलन, एक वेगळी अनुभुती

पाऊस म्हणजे शिंपण, रुजवात, फुटणारा कोंब, दोन पानांची मिठी

पाऊस म्हणजे एका छत्रीतलं गाणं, एकमेंकांचे हातात हात घेणं

पाऊस म्हणजे कधी-कधी होणारी ढगफुटी, विजांची आतिषबाजी

पाऊस म्हणजे शाळेला सुट्टी, ऑफिसला बुट्टी, चहासोबतची भजी

पाऊस म्हणजे कोणा-कोणाची खुप खुप मजा तर काही काहीची सजा

पाऊस म्हणजे पाणी, चरा-चराचं जीवन, देवबाप्पाने दिलेलं आंदणं



निळ्या आभाळी कातरवेळी
मनी दाटून येते सय पावसाळी ।

मेघ ही मग रंग बदलती
सरसर बदले रंगसंगती ।

मागचा पावसाळा असाच उदास
गेला तुजवीन मज भकास भकास ।

आता असेच जायाचे दिस माझे सोवळे
ऋतु सारे कोरडे अन् ओथंबलेले डोळे ।



भरुन आलेलं आभाळ
अंधारलेलं उदास वातावरण
दाटलेल्या धुक्यातुन तु येतेस
अस्पष्टशी दिसत,
येतेस अन् काही बोलत नाहीस
पाहत राहतेस खोलवर डोळ्यांत
आठवत राहतेस मागचा पाऊस
सारं प्रतिबिंबित होतं तुझ्या चेहऱ्यातुन
माझ्याकडे पोहोचतात तुझ्या वेदना-संवेदना
पाऊस सुरु होतो तिघांचा
तुझा, माझा अन् खुद्द पावसाचा,
ओसरतो भर तिघांचाही
निशब्द संवाद झाल्यावर,
निघतेस तु विरळलेल्या धुक्यातुन
डोळ्यांतील ओलावा घेऊन अन् मला देऊन ।



काय गो काय बघतसं माझ्याकडे भिजल्या डोळ्यांनी
भिजुचा असा माझ्या वागंडा तर भिजुक ये जसासा

माझी जावची येळ कधीच निघुन गेली हा
यंदा ना गो निसर्गाचा चक्रच बदलला हा
म्हणुन मी हयसर अडकलंय
आणि तुझ्या तावडीत घावलंय ।

आता पन तुका वाटला असात माका बघुन
भेटुयांत त्येका अन घेवया जोडयेन भिजुन
तु हय अलिकडे आणि तो असा पलिकडलो
मी निघुन गेल्यावर मगे तो तुका भेटतलो ।

गो! तु माझ्या वागंडा किती भिजतंस
त्याच्याबरोबर भिजुसाठी माझी वाट बघतसं
आता कधीच येवचो नाय तो तुझ्यासाठी
असता आजकाल तो तेच्या कामापाठी ।

कोन गो तु त्याचा? कांय तुमचा नाता?
लोंका तुकाच नावा ठेवतीत सारखी येताजाता
उगाच येवान-जावान त्याच्यासाठी भिजु नको
सारख्या-सारख्या त्याच्यासाठी आसवा काढवं नको

ऐ ऐकना,
आज आपण पावसाला बोलावू
त्यालाच आपण आपल्यामधे भिजवू ।

ऐ बोलना,
पावसासोबत आपण त्याचीच गाणी गाऊया
विद्युलतेला आपण साज द्यायला लावूया ।

ऐ सांगना,
उन्हासोबत तो आपल्या लग्नाला येईल
थेंबांच्या अक्षता तो आपल्यासाठी आणेल ।

ऐ बघना,
पावसाच्या चंद्रमौळी झोपडीत राहू
पावसाचे थेंबथेंब भातुकलीत जेवू ।



भर पावसात भिजताना
थेंब निसटतात अंगावरुन
एखादा चुकार थेंब
पापणीवर थबकतो, रेंगाळतो
अन् डोळ्यांमधील पाण्यात मिसळून जातो ।

भर पावसात भिजताना
थेंब निसटतात अंगावरुन
एखादा वाह्यात थेंब
पाठीच्या घळीतुन चाल करतो
अन् पावसात एक थंड शिरशिरी आणतो ।

भर पावसात भिजताना
थेंब निसटतात अंगावरुन
एखादा ओढाळ थेंब
उगाच वेड लावतो भिजलेल्या मनाला
अन् पुन्हा तुझ्या आठवणीत घेऊन जातो ।

भर पावसात भिजताना
थेंब निसटतात अंगावरुन
एखादा रोमांटिक थेंब
ओठांवर रेंगाळतो, टिपशील तु
अन् असा आभास निर्माण करतो ।



बाबा,
तु गेलास तेव्हा पाऊस खुप कोसळत होता...
तु शांत चिरनिद्रेत अन् आम्ही तुझ्याकडे पाहत जागेच
तेव्हा रात्री सोबतीला पाऊस होता ।

तु असा चिरनिद्रेत अन् रात्रभर मला प्रश्न की ,
पाऊस असाच कोसळत राहिला तर
तु जाणार कसा महायात्रेला
तेव्हा सकाळी पाऊस थांबला होता ।

तु निघतानाच पुन्हा आला, रिमझिमत राहिला,
थांबणं तुझ्या हातात नव्हतंच, भर पावसातच तु निघालास
चेहराभर पसरलेलं हसु घेऊन अन् आम्हाला मागं टाकून
तेव्हा डोळयांतुन पाऊस ओथंबत होता ।

# साहित्य प्रतिष्ठान

## आजवरची प्रकाशित ई– पुस्तके

टल्लीची शाळा – टल्ली
मकरंदची त्रिवेणी – मकरंद सावंत, मुंबई
ग्रेव्हयार्ड लिटरेचर – प्राजक्त देशमुख, नाशिक
तो आणि ती – मयुरेश कुलकर्णी, द. आफ्रिका
प्रियेचे अभंग – रमेश ठोंबरे, औरंगाबाद
चार क्षण – संतोष नार्वेकर, मुंबई
देशी दारूचे दुकान – धुंद रवी, पुणे
ई शाळा : मराठी कसे लिहावे – भारती सरमळकर, मुंबई
तो, मी आणि सिगरेट – स्वप्ना कोल्हे, नाशिक
मोरया : संकलन – वैशाली कुलकर्णी, अमृता ढगे, अंबरनाथ, ठाणे
लोकल गोष्टी – स्वाती फडणीस, मुंबई
मीरा – प्राजक्त देशमुख, नाशिक
ओथंब – मंजिरी दाभोळकर, मुंबई
सावळया मुलीची गाणी – तुषार जोशी, नागपुर
सईची वही – सुप्रिया जाधव जोशी, नाशिक, पुणे
अहं ब्रम्हास्मि – स्व. घनश्याम पोटभरे, पुणे
एक होते राजे – मयुरेश कुलकर्णी, द. आफ्रिका